**सर्वसाधारण बदल्या-२०२३-२४**
**व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातील प्रबंधक, औद्योगिक प्रशिक्षण संस्था/सहायक संचालक, महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (अतांत्रिक) (राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन आदेश क्रमांक:बदली-२०२३/प्र.क्र.२४४/व्यशि-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ३० जून, २०२३.

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातील प्रबंधक, औद्योगिक प्रशिक्षण संस्था/सहायक संचालक, महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (अतांत्रिक) (राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांची प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात येत असून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थाना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्रीमती यशोदा बन्सी राठोड | प्रबंधक, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नांदेड, जि. नांदेड. | सहायक संचालक (अतां), जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालय, नांदेड या रिक्त पदावर. |

२. उपरोक्त अधिकाऱ्याची बदली ही प्रशासकीय असल्यामुळे त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार पदग्रहण अवधी व बदली विषयक प्रवास भत्ता शासनाच्या प्रचलित नियमानुसार अनुज्ञेय राहील.

३. बदली झालेल्या अधिकाऱ्याने बदलीच्या पदावर तात्काळ हजर व्हावे. याबाबतची माहिती संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी शासनास तात्काळ सादर करावी.

४. संबधित अधिकऱ्याने शासनाच्या पूर्व परवानगी शिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदनी पोच देय डाकेने परत करावेत.

५. सदर बदली आदेशानुसार संबंधित अधिकारी तात्काळ बदलीच्या पदावर हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारे असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांच्याविरुध्द शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यात येईल, यांची संबंधितानी नोंद घ्यावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०६३०११५७२६०१०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADEEP SAHEBRAO SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT AND ENTREPRENEURSHIP DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=be7f8a656a063523ecdbac5e75130d8b7a4674a77a2691e4bf21582d392883e9, pseudonym=323361D01E3FB518718EE3AAAE55DB3EC668FBE8, serialNumber=415BAA8242ED5D99644FE1533246B0A85DC3D52848FB6CE23F47DAF8D647AE5A, cn=PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
Date: 2023.06.30 11:58:39 +05'30'

**(प्रदीप सा. शिवतरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) संबंधित अधिकारी (संचालकांमार्फत)
३) संबंधित कार्यालय/ संस्था (संचालकांमार्फत)

**प्रत,**

१) मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
४) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
७) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
८) सह सचिव (व्यशि), कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती (व्यशि-१)